२०१५०५२३१५२९३२०४२७ संदेरी खारभूमी योजना ता.म्हसळा, जि.रायगड या योजनेच्या नुतनीकरणाच्या कामास प्रशासकी मान्यता प्रदान करण्याबाबत.

(४०६)

महाराष्ट्र शासन

जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र.खाभूयो २०१०/(५३४/२०१०) खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १०/१/२०१२

पहावे : मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्र.३८०६/खाभू/संदेरी/तां-२(१)/८१५८, दि.१५/११/२०१०

**प्रस्तावना :-**

संदेरी खारभूमी योजना ता.म्हसळा, जि.रायगड, सदर खारभूमी योजना बृहत आराखडयात समाविष्ट आहे. केंद्रीय वन मंत्रालयाने किनारी नियमन अधिनियम १९९१(CRZ) अन्वये या योजनेस सूट दिली आहे. सदर योजनेची एकूण लांबी १५२० मी. असून त्यावर एका उघाडीचा समावेश आहे. सदर योजना स्थानिक माती वापरुन बांधली आहे. समुद्राचे नियमित येणा-या भरती-ओहोटी व अतिवृष्टी यामुळे बांधाची मोठया प्रमाणात धूप होऊन बांध कमकुवत झाला आहे. त्यामुळे शेतक-यांचे मोठे नुकसान होत आहे. ही योजना तातडीने हाती घेण्याबाबत लाभधारक, पंचायत समिती, म्हसळा व मा.आमदार यांनी आग्रही लेखी स्वरुपात मागणी केली आहे. त्यामुळे सदर योजनेचा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून प्राप्त झाला असून सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयान्वये संदेरी खारभूमी योजना ता.म्हसळा, जि.रायगड, या योजनेच्या नुतनीकरणाच्या कामास खारजमीन दरसूची सन २००८-०९ व सा.बां.वि. दरसूची २००९-१० या वर्षांच्या दरसूचीवर आधारित अंदाजित रु.६५,८८,२८९/- (रुपये पासष्ट लक्ष, अठ्ठयाएंशी हजार, दोनशे एकोनव्वद फक्त) इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. उपशीर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

D:\2011\MOHITE\suprama gr\New Microsoft Word Document.doc

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-५, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृदसंधारण (०१) खार जमीन योजना (०१)(०१) बांधकामे (योजनांतर्गत)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०६/प्र.क्र.८२/०६ विनियम दिनांक १३/०३/२००७ मधील तरतूदीनुसार आतंर वित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता ( 09 /२०१२) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( ज.प्र.जहागिरदार )
शासनाचे अवर सचिव

प्रतिलीपी अंदाजाच्या गोषवा-यावसह :-

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, (दवप्र) व सहसचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपसचिव (लघु पाटबंधारे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे
अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपअभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, रायगड
अर्थशाखा १/२(२ प्रती), जलसंपदा विभाग,
खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक खाभूयो २०१०/(५३४/२०१०) खारभूमी दिनांक /१/२०१२ चे सहपत्र
संदेरी खारभूमी योजना ता.म्हसळा, जि.रायगड,
नुतनीकरण अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | एकूण रुपयात |
|---|---|---|
| १ | 'अ' प्राथमिक | ३१६८३.०० |
| २ | 'बी' भूसंपादन | ०.०० |
| ३ | 'सी' मुख्य कामे | ५९३०५८१.०० |
| ४ | 'एफ' आर.एच.टी. वर्क्स | ०.०० |
| ५ | 'के' इमारती | ०.०० |
| ६ | 'एम' वृक्षारोपण | १२०९०.०० |
| ७ | 'ओ' संकीर्ण | ५०००.०० |
| ८ | 'पी' देखभाल | १००००.०० |
| ९ | 'आर' दळणवळण | ०.०० |
| | एकूण | ५९८९३५४.०० |
| | अनुषंगिक खर्च (भूसंपादन वगळून) | ५९८९३५.०० |
| | एकूण | ६५८८२८९.०० |

<u>ठळक वैशिष्टये</u>

| | |
|---|---|
| पुन:प्रापित क्षेत्र | ४१ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | १६०६९० |
| लाभव्यय गुणोत्तर | २.३८ |

D:\2011\MOHITE\suprama gr\New Microsoft Word Document.doc